**मा.उच्च न्यायालयाने वेगवेगळ्या याचिकांमध्ये दिलेल्या आदेशानुसार राज्यातील सर्व अकृषी विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील बिगर नेट/सेट अधिव्याख्यात्यांनी विहीत मुदतीत नेट/सेट अर्हता प्राप्त करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/(३५९/०९)/विशि-३
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० सप्टेंबर , २०१०.

वाचा:-

१) विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र.F.1/11/87(CPP) दि.१९ सप्टेंबर, १९९१

२) विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्रमांक F.1-1/2002 (PS) Exemp. दि.१ जून, २००९ व केंद्रशासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, राजपत्र दि.११ जुलै, २००९.

३) शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/(३५९/०९)/विशि-३, दिनांक १२ नोव्हेंबर, २००९.

४) विद्यापीठ अनुदान आयोगाचे सर्व विद्यापीठांच्या कुलगुरुंना पाठविलेले पत्र क्रमांक F.No. 1-1/2002 (PS) Pt file-III दि. २७ ऑगस्ट २००९.

५) शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/(४३८/०९)/विशि-३, दिनांक ३० जानेवारी,२०१०

६) शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/(३५९/०९)/विशि-३, दिनांक ०८ सप्टेंबर, २०१०.

## शासन परिपत्रक

अकृषी विद्यापीठे व महाविद्यालयातील शिक्षकांच्या अर्हतेबाबत विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी आदेश दिलेले आहेत. मा. कुलपती यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कुलगुरुंच्या संयुक्त बैठकीत (J.B.V.C) तसेच मा.उच्च न्यायालयाने निरनिराळया याचिकांमध्ये निर्णय देताना उच्च शिक्षणाचा दर्जा वाढविण्यासाठी व शिक्षणाच्या जागतिकीकरणाच्या स्पर्धेत राज्यातील विद्यार्थी टिकून रहावेत यासाठी योग्य ती पावले उचलण्यासाठी शासनाला व विद्यापीठांना आदेशित केलेले आहे.

२. वरील सर्व बाबी विचारात घेऊन शासनाने वेळोवेळी आवश्यक ते आदेश संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निर्गमित केलेले आहेत. संदर्भाधीन अनु.६ येथील दि.८ सप्टेंबर, २०१० च्या शासन निर्णयातील परि.क्र.८ (ii) मध्ये **सर्व बिगर नेट / सेट अधिव्याख्यात्यांनी दि.३१.१२.२०११ पर्यन्तच्या**

या दोन वर्षाच्या कालावधीतील प्राप्त होणाऱ्या चार संधीत नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक असल्याचे आदेशीत केले आहे.

३. तथापि राज्यातील काही बिगर नेट / सेट अधिव्याख्यात्यांना विद्यापीठ अनुदान आयोगाने काही अटी व शर्तींच्या अधीन राहून नेट / सेट अर्हतेपासून सूट दिलेली आहे, अशा सूट दिलेल्या अधिव्याख्यात्यांना सुध्दा उक्त विहीत मुदतीत नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे किंवा कसे ही बाब वरील संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये स्पष्ट केलेली नाही. त्यामुळे ज्या बिगर नेट / सेट अधिव्याख्यात्यांना विद्यापीठ अनुदान आयोगाने नेट / सेट अर्हतेपासून सूट दिलेली आहे. अशा अधिव्याख्यात्यांच्या बाबतीत असे स्पष्ट करण्यात येते की, **विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी दिलेले निर्देश व सूचनांप्रमाणे कार्यरत असलेल्या बिगर नेट / सेट अधिव्याख्यात्यांना नेट / सेट मधून विद्यापीठ अनुदान आयोगाने ज्या अटी व शर्तीची पूर्तता करण्याच्या अधीन राहून सूट दिलेली आहे अशा अधिव्याख्यात्यांना नेट / सेट अनिवार्य असणार नाही.**

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्रमांक **२०१००९३०१४४१६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

( रा. गो. जाधव )
उप सचिव , महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा. मंत्री ,(उवतंशि), यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री, (उ.व तं. शि.), यांचे खाजगी सचिव.
६) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे
८) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
९) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव / कक्ष अधिकारी , उच्च व तंत्रशिक्षण विभाग
१०) निवड धारिका-३